महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान बार्शी-टाकळी शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :- नगरो-२०२१/प्र.क्र.२१२/नवि-३३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २४ ऑगस्ट, २०२३

संदर्भ:-

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र.क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
३. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१६/प्र.क्र.३२८/नवि-३३, दिनांक ०४ ऑक्टोबर, २०१६.
४. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र: संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३, दिनांक १४ फेब्रुवारी,२०१७.
५. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१५/प्र.क्र.२७३/नवि-३३, दिनांक ११ डिसेंबर, २०२०
६. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र: ग्रापाधो-२०२१/प्र.क्र.१२२/पापु-०७, दिनांक २९ जून,२०२२.
७. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: नगरो-२०२१/प्र.क्र.२१२/नवि-३३, दिनांक २४ मार्च, २०२२
८. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: नगरो-२०२३/प्र.क्र.२१३/नवि-३३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.
९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती विभाग यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्रमांक जा.क्र.मुअ/मजीप्रा/अम/रेचिशा/सु.तांमं/२०६५/२०२२, दिनांक ०२ ऑगस्ट, २०२२.
१०.नगरपरिषद प्रशासन संचालनाल याचे क्र.नपप्रस/नगरोत्थान/बार्शीटाकळी पा.पु./प्र.क्र.४३४/ २०२१/का.७ /२९०८,दिनांक २६ ऑगस्ट, २०२३.
११. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१ रोजी झालेल्या प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत बार्शी-टाकळी नगरपंचायतेचा पाणी पुरवठा प्रकल्प नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत संदर्भाधीन क्र. १० च्या पत्रान्वये राज्यस्तरीय मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता. या प्रकल्पास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती विभाग यांनी चालू दरसूचीनुसार सुधारित तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारसीनुसार सदर प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची तसेच महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत संदर्भाधिन क्र.७ अन्वये मंजूर बार्शी-टाकळी पाणीपुरवठा प्रकल्पाचा शासन निर्णय अधिक्रमीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

०१. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत संदर्भाधिन क्र.७ अन्वये मंजूर करण्यात आलेली बार्शी-टाकळी पाणीपुरवठा प्रकल्पाची प्रशासकीय मान्यता अधिक्रमीत करण्यात येत आहे व याच अभियानांतर्गत सादर करण्यात आलेल्या बार्शी-टाकळी नगरपंचायतेच्या पाणी पुरवठा प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतूदीच्या व मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती विभाग यांनी दिनांक ०२ ऑगस्ट, २०२२ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सुधारित तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे.

| Sr. No. | Particulars | Amount |
|---|---|---|
| A) | From Katepurna Dam | |
| | **Sun Work No. 1** | |
| | Working Survery | 500000 |
| | **SUB WORK No. 2** | |
| | Head Works | |
| | **SUB WORK No. 2 a)** | |
| | Approach Channel Av. Depth 2.265 m & length 60.0 m | 2422500 |
| | **SUB WORK No. 2 b)** | |
| | b) Intake well 3.0 m dia, 6.53 m deep | 1096600 |
| | **SUB WORK No. 2 c)** | |
| | c) Connecting Main 450 mm dia. DI K-7 Pipes 90 M Long | 3114050 |
| | **SUB WORK No. 2 d)** | |
| | d) Inspection well No.1 2.50 m dia, 6.98 m deep | 944900 |

| | | |
|---|---|---|
| | **SUB WORK No. 2 e)** | |
| | e) Inspection well No.II 2.50 m dia, 8.43 m dee | 1093600 |
| | **SUB WORK No. 2 f)** | |
| | 1) Jack Well 6 M Dia. 19.86 M Deep | 6809950 |
| | **SUB WORK No. 2 g)** | |
| | g) Approach Bridge 3.50 M Wide 50 M long | 3806550 |
| | **SUB WORK No. 3** | |
| | Raw Water Pumping Machinery | 3846900 |
| | Raw Water Pumping Machinery V.T Pumps 50.00 BHP-2 Nos. | |
| | On Proposed Jack Well | |
| | **SUB WORK No. 4** | |
| | Raw Water Rising Main 250 mm dia. D.1 K-9 Pipes 3600 M Long | 17635550 |
| | **SUB WORK No. 5** | |
| | Un Conventional Water Treatment Plant Capacity 3.50 MLD | 16263850 |
| | **SUB WORK No. 6** | |
| | Pure Water Gravity Main | 71848750 |
| | i) 350 mm dia. D.I K-7 Pipes 1615 M, | |
| | ii) 300 mm dia. D.I K-7 Pipes - 11006 M | |
| | iii) 200 mm dia. D.I K-7 Pipes-735 M | |
| | **SUB WORK No. 7** | |
| | RCC E.S.R-450000 Liter capacity 16 M Staging & 450000 Liter capacity 17 M Staging | 14127100 |
| | **SUB WORK No. 8** | |
| | Distribution System | 80321500 |
| | From 280 mm dia. To 110 mm dia. HDPE pipes – 48.90 Km | |
| | **SUB WORK No. 9** | |
| | Road Reinstating | 39575350 |
| | **SUB WORK No. 10** | |
| | Trial Run of Scheme | 93600 |
| | **SUB WORK No. 11** | |
| | Miscellaticos Works | 17539900 |
| | **Total (A) Rs.** | 281040650 |
| | **Add 18 % GST** | 50587317 |
| | **Total** | 331627967 |
| | **Say Rs.** | **33.163 Cr.** |
| | प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी | कार्यादेश दिनांका पासून १८ महिने |

०२. <u>बार्शी-टाकळी नगरपंचायतेचा पाणी पुरवठा प्रकल्प</u> वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील:-

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ९०%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १०%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | बार्शी-टाकळी नगरपंचायत | रु.३३.१६३ कोटी | रु.२९.८४७ कोटी | रु.३.३१६ कोटी |

०३. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **बार्शी-टाकळी नगरपंचायतेच्या पाणी पुरवठा** प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

**अ) प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा :-**

१. सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन **बार्शी-टाकळी नगरपंचायतेमार्फत** करण्यात यावे.

२. या अभियानांतर्गत प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) नेमणुकीबाबत दिनांक १२ एप्रिल, २०२३ रोजी या विभागाने निर्गमित केलेल्या शासन नुसार कार्यवाही करावी.

३. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची नियुक्ती नगरपंचायतेने एक महिन्यात करावी. त्याबाबत आवश्यक ठराव नगरपंचायतेने करावा.

४. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क (PMC Charges) संबंधित सल्लागारास **स्वनिधीतून** प्रदान करणे नगर परिषदेवर बंधनकारक राहील. त्याबाबत आवश्यक ठराव नगरपंचायतेने करावा.

५. सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

**ब) सुधारणांची पूर्तता:-** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहील. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

**I)** बंधनकारक सुधारणा:-

१. प्रकल्प मंजूरीच्या पहिल्या वर्षात नगरपंचायतेने त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यू नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

२. उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसूली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहील.

५. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुनर्मुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहील.

६. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने “घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६” च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचितरित्या करणे बंधनकारक राहील.

७. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसूली पहिल्या वर्षी किमान ८०% करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९०% या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

**II)** <u>वैकल्पिक सुधारणा:-</u>

१. मलनि:स्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुनर्प्रक्रिया व पुनर्वापर करण्याबाबतच्या घटकांचा समावेश त्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करावा.

२. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्यजलसंचय करावे.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जल लेखापरिक्षण (वॉटर ऑडीट) करुन घ्यावे.जललेखापरिक्षण अहवालात नमूद त्रुटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रुटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

क) निधी वितरणाची कार्यपद्धती:-

१. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर संबंधित नागरी स्वराज्य संस्थेने प्रकल्पाचा आर्थिक आराखडा (Financial Closure Report) नगर विकास विभागास सादर करावा. त्यानंतर व कार्यादेश दिल्यानंतर सदर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर तो हप्ता व स्थानिक स्वराज्य संस्थेचा त्याप्रमाणातील स्वहिस्सा हा एकत्र निधी, शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी त्यांना राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या १४ व्या वित्त आयोग (मुलभूत व कार्यात्मक) अनुदानाशी तसेच,१५ व्या वित्त आयोगाच्या प्राप्त झालेल्या/होणाऱ्या अनुदानाशी सांगड (Convergence) घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी यामधून मिळणारा निधी चिन्हांकीत करुन ठेवणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

४. राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाची रक्कम व त्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने जमा केलेली पहिल्या हप्त्याच्या स्वहिश्याची रक्कम अशा एकत्रित रकमेच्या ७५ टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतरच राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

५. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करण्याचा प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव सादर करावा.

६. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास राज्य शासनाने संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस राज्य शासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्य शासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल त्याप्रमाणात संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे अशा योजनेत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.

७. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व तो अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी संबधित स्थानिक स्वराज्य संस्था/संबधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

ड) <u>निविदा प्रक्रिया, कार्यादेश व कार्यान्वयन :-</u>

१. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर ७ दिवसाच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व ९१ व्या दिवसापूर्वी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे **<u>कार्यान्वयन यंत्रणेवर</u>** बंधनकारक राहील.या प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा बार्शी-टाकळी नगरपंचायत आहे. त्यामुळे या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, बार्शी-टाकळी नगरपंचायत व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांची राहील.

२. सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया राबविताना संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयातील सूचनांचे तंतोतंत पालन करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

३. यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.

४. सदर **<u>पाणीपुरवठा प्रकल्प</u>** पूर्ण करताना राज्य शासनाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन परिपत्रकान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील.

५. सदर प्रकल्पासाठी विहित केलेल्या कालमर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

६. सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश दिल्यानंतर प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या पाईप्स इत्यादी वस्तूंची खरेदी ही प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराच्या मार्गदर्शनाने करावी.

७. सदर प्रकल्पासाठी सुरुवातीला अनावश्यक स्वरुपात **<u>कोणत्याही प्रकारच्या पाईप्सची खरेदी करणे व त्यासाठी प्रकल्प निधीतून प्रदान करणे ही गंभीर स्वरुपाची वित्तिय</u>**

<u>अनियमितता</u> समजण्यात येईल व त्यासाठी <u>संबंधित कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यंत्रणेस जबाबदार</u> धरण्यात येईल.

८. सदर प्रकल्पाच्या निविदेमध्ये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दिनांक २९ जून, २०२२ रोजीच्या भावभिन्नता व विशेष मदतीबाबतच्या शासन निर्णयातील आवश्यक तरतूदींचा समावेश करण्यात यावा.

इ) <u>प्रकल्पाचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण :-</u>

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासनाने विहीत केलेल्या यंत्रणे पैकी एका यंत्रणेकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करुन घेणे बंधनकारक राहील, तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील, तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

फ) <u>प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी :-</u>

१. महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयकृत बँकांकडून" तसेच "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" (एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल) व शासनमान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.

२. वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात यावी, तसेच शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

ग) <u>प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती:-</u>

१. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर **<u>प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत व नगरपंचयतेमार्फत</u>** करण्यात यावे, जेणेकरुन सदर प्रकल्पांतून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वत राहील.

२. सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

३. प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे पाणी पुरवठा कराची आकारणी करणेबाबत सर्वसाधारण सभेची

मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणे नगरपरिषदेवर बंधनकारक राहील.

ह) **इतर बंधनकारक अटी व शर्ती :-**

१. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, **मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधितनागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची** राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

२. संदर्भाधीन क्र. १ ते ४ या शासन निर्णयातील तरतूदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२३०८२४१३२५१९२६२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: cn=SHRIKANT C ANDGE, o=Mantralaya, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, email=shrikant.andge@nic.in, c=US
Date: 2023.08.25 19:32:48 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, पाणीपुरवठा विभाग, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२), मंत्रालय, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, अमरावती.
१२. जिल्हाधिकारी, अकोला.
१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती विभाग.
१४. जिल्हा प्रशासन अधिकारी, अकोला.
१५. मुख्याधिकारी, बार्शी-टाकळी नगरपंचायत, जि. अकोला.
१६. निवड नस्ती, नवि-३३.